**शिरगाव - कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नुतनीकरण करणेच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो - २०२२/(प्र.क्र.१५९)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे, २०२३

**पहावे-**

**१.** जलसंपदा विभाग शासन निर्णय क्रमांक खाभूयो-२०२१ /(प्र.क्र.२१९) खारभूमी,मंत्रालय मुंबई -४०००३२ दिनांक ०४ मार्च ,२०२३

**२.** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,कोंकण प्रदेश,मुंबई यांचे पत्र क्र.मुअकोप्र/खाभूयो / शिरगाव - कोठे /तां- ३ /४४०१, दिनांक १४/११/२०२२. चे पत्र

**प्रस्तावना:-**

शिरगांव -कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर ही योजना वसई तालुक्यातील वैतरणा मुख्य खाडीच्या डाव्या तीरावरील उपखाडीवर आहे. शिरगांव कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर ही योजना पालघर जिल्हातील खारभूमी विकास योजनेच्या बृहत आरखड्यात समाविष्ट आहे. तसेच केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे कडील पत्र जा. क्र. जे-१७०११/३२/२००१ /आय -३/दिनांक २२/८/२००३ अन्वये सागरी नियमन कायदा १९९१ मधून सूट दिलेल्या कोकणातील एकूण ५७५ (जूना ठाणे जिल्हातील १०८ खारभूमी योजना) खारभूमी योजनांमध्ये सदर योजनेचा समावेश आहे.सदरहू योजना बोर्डकालीन असून सन १९९२ मध्ये सदर योजनेचे नुतनीकरणाचे काम पूर्ण झालेले आहे. सदर योजना पूर्ण होऊन २९ वर्षाचा कालावधी लोटला आहे.सदर योजनेमुळे ७१ हेक्टर क्षेत्र पुनःप्रापीत होणार आहे.योजनेच्या बांधाची एकूण लांबी १८१० मीटर आहे, तसेच या योजनेवर सा. क्र. ९० मी.,१०६५ मी. व १४५० मी वर अशा ३ उघाड्या आहेत.

ही योजना खारलॅन्ड बोर्डामार्फत पूर्ण झालेली आहे.योजनेच्या नुतनीकरणाचे काम सन १९९२ मध्ये करण्यात आले होते. योजनेचे नुतनीकरण करुन २९ वर्षाचा कालावधी लोटल्यामुळे तसेच वारंवार होणाऱ्या भरतीमुळे खारे पाणी प्रापण क्षेत्रात शिरुन शेत जमिनीचे नुकसान होत असल्याने, बृहत आराखडयात समाविष्ट असलेल्या योजनेचे काम करुन मिळावे, म्हणून या योजनेवरील खारभूमी लाभार्थी शेतकरी यांनी योजनेचे नुतनीकरण करुन मिळावे म्हणुन मागणी केलेली होती त्यास अनुसरून संदर्भाधीन क्र.१ अन्वये रु.१,१८,६३,३४२ /- इतक्या किंमतीस खारभूमी विभागाची दरसूची २०१९-२० नुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. मुळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक हे खारभूमी दरसुची सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारित होते तथापी शासन निर्णय क्र निविदा ०४१७/( प्र.क्र. २४७/१७)/मो.प्र.१ दि ३० नोव्हेंबर २०१८ मध्ये नमुद मुद्दा क्र.१.२ अन्वये निविदा कार्यवाही हाती घेण्यापुर्वी प्रस्तावित कामाचे अंदाजपत्रक प्रथम चालू दरसूचीने अद्यावत करावे व अंदाजपत्रकास सक्षम स्तरावर तांत्रिक मान्यता घ्यावी असे निर्देश देण्यात आले आहेत. लाक्षणिक अनुदान प्राप्त झाल्यानंतर निविदा प्रक्रिया सुरु करण्याच्या दृष्टीने तांत्रिक मान्यता अंदाजपत्रक प्रचलित सन २०२२-

२३ च्या जलसंपदा विभागाच्या दरसूचीनुसार अद्यावत किंमत ही प्रशासकीय मान्यता किंमती पेक्षा जास्त असल्याने तांत्रिक मान्यता न देता केवळ सन २०२२-२३ दरसूचीनुसार अद्यावत करून तसेच स्वामित्व धनाचे सुधारित दर, वस्तू व सेवा कर चे सुधारित दर या कारणांमुळे वाढ झाल्याने प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून सादर करणेत आले आहे.

योजनेचा पुन:प्रापित क्षेत्रानुसार प्रति हेक्टरी खर्च रु. २,६०,९४३/- इतका येत असून तो सध्याच्या प्रचलित आर्थिक मापदंड रु. २,८६,४१६/- पेक्षा कमी आहे.

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्र क्र.२ अन्वये प्राप्त झालेला शिरगांव- कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर या खारभूमी योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

शिरगांव- कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नूतनीकरणाच्या कामास खारभूमी विभागाची दरसूची सन २०२२-२०२३ व जलसंपदा विभागाची दरसूची सन २०२२-२०२३ वर आधारित अंदाजित रूपये १,८५,२६,९४४/- (रुपये एक कोटी पंच्याऐंशी लक्ष सव्वीस हजार नऊशे चव्वेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेस याव्दारे प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रुपये १,०९,१५,७०१/- (रुपये एक कोटी नऊ लक्ष पंधरा हजार सातशे एक फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रुपये १०,९१,५७०/- (रुपये दहा लक्ष एक्यानव्व हजार पाचशे सत्तर फक्त), GST करीता रु. १९,६४,८२६/- (रुपये एकोणीस लक्ष चौसष्ठ हजार आठशे सव्वीस फक्त), गौण खनिज करिता रु. ४४,४५,६९०/- (रुपये चव्वेचाळीस लक्ष पंचेचाळीस हजार सहाशे नव्वद फक्त) व कामगार विमा करीता रू.१,०९,१५७/- (रुपये एक लक्ष नऊ हजार एकशे सत्तावन्न फक्त) अशी तरतूद असून तरतुदींचा उपशीर्षवार गोषवारा सोबतच्या "परिशिष्टामध्ये" देण्यात येत आहे. सदरील प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय -५,मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत ) (४४०२०३८४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) प्रस्तावित योजनेचा खर्च लेखाशिर्ष ४४०२ ०३८४ खाली उपलब्ध निधीमधून होणार असल्याने या लेखाशिर्षाखाली प्रगपथावरील योजनांचे दायित्व विचारात घेऊन योजना विहित कालावधीत व प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण होत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३) जलसंपदा विभाग शासन निर्णय, दिनांक ०४.०३.२०२३ मधील तरतुदींनुसार योजनेचे बांधकाम सुरु करण्यापूर्वी लाभधारकांची सहकारी संस्था स्थापन करण्यात यावी व खारभूमी योजनेचे काम पूर्ण करण्यासाठी पुनःप्रापित क्षेत्रातील लाभधारकांकडून प्रकल्पातील सहभाग म्हणून रुपये ५००/- प्रती हेक्टर खर्च (किमान रुपये २००/-रोख व रुपये ३००/- मजुरीच्या स्वरूपात किंवा रोखीने ) घेण्यात यावा.योजनेचे काम पूर्ण झाल्यानंतर योजना देखभाल व दुरुस्तीसाठी त्यांच्याकडे हस्तांतरित करणे आवश्यक राहील.

४) सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पीय केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५) या कामाकरिता पर्यावरण विषयक तसेच इतर सर्व वैधानिक मान्यता घेतल्यानंतरच प्रत्यक्ष काम सुरु करावे.

६) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहीत धरता येणार नाही.सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी अथवा नंतरही या कामावर कोणतीही अनियमितता झालेली असल्यास अथवा आढळल्यास सदर सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केल्याने ती नियमित झालेली आहे असे गृहीत धरता येणार नाही.

७) सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

८) प्रचलित शासन निर्णय,नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे प्रदेश कार्यालयाची राहील.

९) सदर प्रकल्पाच्या प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत किंमतीला तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

१०) संपूर्ण प्रकल्प हा सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

सदरहू शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम भाग-२, दिनांक १७/०४/२०१५, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व सह सचिव तसेच नियोजन विभागाच्या (कायार्सन-१४३४) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६८/२०२३, दिनांक.१६/०३/२०२३ नुसार व वित्त विभाग (व्यय १२ ) संदर्भ क्र.१२० दि.२८.०३.२०२३ नुसार दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता या विभागातील खारभूमी कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत ४ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५१६१२२९४८१३२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:**- परिशिष्ट "अ"

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.05.16 12:31:59 +05'30'

**( अमोल फुंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य ,यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेते,विधानपरिषद / विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (जलसंपदा ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
९. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
१०.जिल्हाधिकारी,पालघर
११.मुख्य अभियंता, (द व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
१३.आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे.
१६. अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. अवर सचिव, अर्थ शाखा १/२,मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन -१४३४) ,मंत्रालय, मुंबई.
२०. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्रमांकः खाभूयो २०२२/प्र. क्र.१५९ / खारभूमी

दिनांक : १६ /०५ /२०२३ चे सहपत्र)

## परिशिष्ट अ

**शिरगांव- कोठे खारभूमी योजना, ता. वसई, जि. पालघर या योजनेच्या नुतनीकरण करणेच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतच्या प्रस्तावातील उपशीर्षनिहाय तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक कामे | ०.०० |
| २ | ब- भूमी संपादन | ०.०० |
| ३ | क- कामे बंधारा | १,०२,३८,६४०.०० |
| ४ | फ- आर.एच.टी. वर्क | ०.०० |
| ५ | के- इमारती | ०.०० |
| ६ | एम- वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | ओ- संकीर्ण | ०.०० |
| ८ | पी- देखभाल | ०.०० |
| ९ | आर- दळणवळण | ६,७७,०६१.०० |
| | एकूण कामे रुपये | १,०९,१५,७०१.०० |
| | गौण खनिज | ४४,४५,६९०.०० |
| | जी. एस. टी. | १९,६४,८२६.०० |
| | कामगार विमा | १,०९,१५७.०० |
| | अनुषांगिक खर्च १०% | १०,९१,५७०.०० |
| | **एकूण रुपये** | **१,८५,२६,९४४.००** |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र | ७१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रुपये) | रुपये २,६०,९४३/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.५९ |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.05.16 12:32:15 +05'30'

( अमोल फुंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन